GR-200407301422560001-1201

जिल्हा परिषद,पंचायत समिती
व ग्राम पंचायतींकडील
स्थावर/जंगम मालमत्तेचे अभिलेख
अद्ययावत ठेवणे बाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक झिपस २०००/ प्र.क्र. १५६ / पंरा ८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ जानेवारी, २००४

**प्रस्तावना:**

राज्यातील जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांच्याकडे खालील दोन प्रकारे खुल्या जमिनी व इमारती ताब्यात आहेत -

१) जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १०० अन्वये हस्तांतरीत योजनांबरोबरच योजनांची कार्यवाही करण्यासाठी हस्तांतरीत झालेल्या इमारती व खुल्या जागा.

२) भूतपुर्व जिल्हा लोकल बोर्ड यांच्याकडून जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत झालेल्या इमारती व खुल्या जागा.

जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १०० अन्वये हस्तांतरीत झालेल्या योजनांतर्गतच्या जागा या एकतर भूसंपादन अधिनियमानुसार संपादीत केलेल्या आहेत किंवा महाराष्ट्र जमिन महसूल संहितेनुसार शासकीय खुल्या जागा योजनांच्या कार्यवाहीसाठी हस्तांतरीत केलेल्या आहेत. त्यामुळे या जागा/ इमारतींची विल्हेवाट शासनाच्या परवानगी शिवाय लावता येत नाहीत. भूतपुर्व जिल्हा लोकल बोर्डाकडून हस्तांतरीत झालेल्या इमारती / खुल्या जागा यांची मालकी संपूर्णपणे जिल्हा परिषदांची असते व महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम १२८ प्रमाणे जिल्हा परिषदा त्यांची विल्हेवाट लावण्यास सक्षम असल्या तरी त्यास शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असते.

२. जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायतींकडील स्थावर/ जंगम मालमत्तेचे अद्ययावत लेखे ठेवले जात नसल्यामुळे त्यांचा विनीयोग करण्यासंदर्भात अनेक अडचणी निर्माण होतात. या मालमत्तेवर अतिक्रमण होत असल्याने कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होतो. या बाबत विधी मंडळातील विभाग संलग्न स्थायी समितीने विभागाच्या अर्थसंकल्पीय मागण्यांचा आढावा घेताना खालील प्रमाणे शिफारस केली आहे -

" राज्यातील जिल्हा परिषदांकडे अनेक प्रकारची मालमत्ता आहे. या मालमत्तेची नोंददार करणे, त्यासंबंधीचा अद्ययावत अभिलेख ठेवणे व संनियंत्रण करणे या व अशा

कामांसाठी जिल्हा परिषदेमध्ये अधिकारी वर्ग नियुक्ती करण्यात आलेली नाही. परिणामी आपल्या जिल्हा परिषदेकडे किती व कोठे मालमत्ता आहे या बाबत संबंधित जिल्हा परिषदांना पुरेशी कल्पना नसते. अहमदनगर जिल्हा परिषदेने ज्या प्रमाणे या कामांसाठी मालमत्ता अधिका-यांची नियुक्ती केली आहे त्याच धर्तीवर राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमध्ये मालमत्ता अधिका-याची नियुक्ती करण्यात यावी अशी समितीची शिफारस आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेऊन जिल्हा परिषदा, पंचायत समिती व ग्राम पंचायतीकडील स्थावर/जंगम मालमत्तेचे अभिलेख अद्ययावत ठेवण्याची जबाबदारी जिल्हा परिषदेमधील अधिका-यावर सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायती यांच्याकडील स्थावर/जंगम मालमत्तेचे अभिलेख तयार करण्याची व अद्ययावत ठेवण्याची जबाबदारी उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्राम पंचायत ) , जिल्हा परिषद यांच्यावर सोपविण्यात येत आहे. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) जिल्हा परिषद यांनी खालील प्रमाणे कार्यवाही करावी :-

स्थावर अ) जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायतीकडील इमारती व त्यासभोवतालची मोकळी जागा, इमारतींविना असलेल्या खुल्या जागा व सर्व

जंगम मालमत्ता यांची मालमत्ता नोंदवहीत नोंद घ्यावी.

ब) या यादीप्रमाणे असलेल्या सर्व जमिनींस आवश्यकते प्रमाणे कुंपण घालण्यात यावे.

क) या जागांवर ती संबंधित जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत यांच्या मालकीची असल्याबाबत व ती कोणत्या विशिष्ट प्रयोजनासाठी राखीव आहे, या बाबतचा स्पष्ट फलक लावण्यात यावा.

ड) स्थावर मालमत्ते संबधातील महसूल विभागाकडील व अन्य कागदपत्रे यांची पडताळणी करुन ती व्यवस्थित आहेत यांची खात्री करावी व त्याप्रमाणे स्थावर मालमत्तेच्या नोंदवह्या वेळोवेळी अद्ययावत कराव्यात.

इ) मोकळ्या जागांवरील अतिक्रमणे विहित पध्दतीने दूर करावीत.

२. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) जिल्हा परिषद, यांनी पंचायत समिती व ग्राम-पंचायत पातळीवरील काम जिल्हा परिषदेच्या बांधकाम खात्यातील अभियंता सेवे मार्फत करुन घ्यावे. पंचायत समिती पातळीवरील कनिष्ठ अभियंत्यावर संबंधित तालुका स्तर व त्याअंतर्गत असलेल्या सर्व ग्रामिण स्तरावरील स्थावर / जंगम मालमत्तेचा आढावा

घेणे, त्याची मोजदाद करणे, मालकी हक्क / कब्जे हक्का बाबतच्या नोंदी व दस्तऐवज पूर्ण करणे, जमिन / मालमत्तेचा विनियोग, वापर याबाबी अहवाल व शिफारस सादर करणे इ. कामांची जबाबदारी सोपविण्यात यावी. पंचायत समिती पातळीवरील संनियंत्रण अधिकारी म्हणून गट विकास अधिका-याकडे जबाबदारी सोपविण्यात यावी. जिल्हा स्तरावरील संनियंत्रक अधिकारी म्हणून उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) जिल्हा परिषद यांनी सर्व पंचायत समित्यांवरील कामकाजाबाबत नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी पार पाडावी. तसेच महसूल प्राधिकारी व शासन यांच्याशी समन्वयाचे काम पार पाडावे.

३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर आदेश तात्काळ अंमलात आणावेत .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अश्विनी अ. तांम्हाणे )
कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४) मा. मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय
५) मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय
६) विभागीय आयुक्त (सर्व)
७) जिल्हाधिकारी (सर्व )
८) मुख्य कार्यकारी अधिकारी. जिल्हा परिषद (सर्व)
९) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्राम पंचायत) जिल्हा परिषद (सर्व)
१०) महालेखापाल १/२ ( लेखा परिक्षा )( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र मुंबई /नागपूर
१०) सर्व मंत्रालयीन प्रशासनिक विभाग
११) ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने, सह सचिव/उप सचिव
१२) निवड नस्ती कार्यासन क्रमांक पंरा ८